**डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेंस योजनांतर्गत मंजूर तरतूदीमधून २०० प्रशिक्षणार्थी क्षमतेच्या वसतिगृहाकरिता वातानुकूलित यंत्रणा बसविण्याकरिता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**
**(सन २०२१-२२) कार्यक्रमांतर्गत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-२०२१/प्र.क्र.१४७/२१/१२-अ, (१)**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च,२०२२

**संदर्भ :-** १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.६ .०४. २०२१.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.२४.६.२०२१
३. संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांचे पत्र क्र.आस्था /क.लि./कावि-३१६/२०२२, दि.१४.३.२०२२
४ .शासन निर्णय वित्त विभाग, क्र .विअप्र-२०१३/प्रक्र.३०/१३ /विनियम ( भाग-२) दि.२०.९. २०१९
५. शासन परिपत्रक, क्रमांक सार्वजनिक बांधकाम विभाग, संकीर्ण-२०१९/प्रक्र.१०/इमा-२ दि.२५.९.२०१९
६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.१७.०३.२०२२.

**प्रस्तावना :-**

डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेंस मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशीर्ष “२०७०-इतर प्रशासनिक सेवा ००३- प्रशिक्षण-राज्य योजनांतर्गत योजना (०५) (००) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान ( २०७००६८४ ) ३१ सहायक अनुदान “( वेतनेतर )” या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता एकूण रु.२९६.१० लाख इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. सुधारित अंदाजामध्ये रु.२२२.०८ लाख इतकी तरतूद करण्यात आली असून या तरतुदीमधून या आर्थिक वर्षात या लेखाशिर्षाखाली कोणताही खर्च झालेला नाही.

२. संस्थेने, अमरावती हे ठिकाण विदर्भ क्षेत्रात येत असल्यामुळे माहे मार्च ते जुन या कालावधीत जिल्हयातील तापमान ४५ C ते ४८ C पर्यंत राहत असल्यामुळे तसेच प्रशिक्षणार्थी यांना अधिकाधिक सुविधा प्राप्त होण्याचे दृष्टीने वसतीगृहातील निवासी खोल्यामध्ये वातानुकुल यंत्रणेची आवश्यकता असल्याचे कळविण्यात आले आहे. सदर इमारतीमध्ये १०० निवासी खोल्या, भोजन कक्ष, ग्रंथालय, मनोरंजन कक्ष व हॉल आहे. त्यानुसार प्रति कक्षात १ AC याप्रमाणे १०० AC व हॉलसाठी प्रत्येकी ५ याप्रमाणे २० AC असे एकूण १२० AC हे. १.५ टन क्षमतेचे आवश्यक असून त्याकरिता रु.१०८.५९ लाख इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक सादर केले आहे. संस्थेच्या उपरोक्त कामांस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेला सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाच्या कार्यक्रमांतर्गत खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे एकूण रु.२२२. ०८ लाख इतके सहायक अनुदान खर्चाकरिता अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

२.  प्रस्तुत कामांचे अंदाजपत्रक शाखा अभियंता, उप अभियंता व कार्यकारी अभियंता ( विद्युत ) सा. बां. मंडळ, अमरावती यांनी साक्षांकित केलेल्या आणि " मुख्य अभियंता ( विद्युत )" सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांनी C.S.R. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी निश्चित केल्याप्रमाणे रु.१,०८,५९,१३३/- इतक्या रक्कमेच्या ए.सी. खरेदीबाबतच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. ५ च्या शासन परिपत्रकास अनुसरून तांत्रिक मान्यता दिली आहे.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ESTIMATE | | | | | | | |
| NAME OF WORK - PROVIDING AIR CONDITIONING UNITS IN २०० STUDENTS HOSTEL BUILDING AT DR.PANJABRAO DESHMUKH ADMINISTRATIVE & DEVELOPMENT TRAINING PRABODHINI , AMRAVATI,DIST - AMRAVATI | | | | | | | |
| ESTIMATE NO.¬OW/ / EE/AMT/२०२१-२२ | | | | | | | |
| SR.NO | CSR Item no | QUANTITY | | DISCRIPTION OF ITEM | RATE | UNIT | AMOUNT |
| ३२ | ९-१-२ | ४.० | NO | Providing earthlings with copper earth plate size ३०X३०X०.३१५ cm complete with all materials ,testing & recording the results as per specification no EA-EP | ५८७२.०० | Each | २३४८८.०० |
| | | | | | TOTAL | RS | ९३२२७४४.४० |
| | | | | Add ४ % contingency charges | | Rs | ३७२९०९.७८ |
| | | | | | TOTAL | RS | ९६९५६५४.१८ |
| | | | | Add १२ % G S T | | Rs | ११६३४७८.५० |
| | | | | | TOTAL | Rs | १०८५९१३२.६८ |
| | | Say | Rs | १०८५९१३३.०० | TOTAL | Rs | १०८५९१३२.६८ |

**अ**. सदर अंदाजपत्रक सन २०२१-२२ च्या अमरावतीच्या दरसूचीवर आधारित आहेत.

**ब**. अंदाजपत्रकात ४ टक्के आकस्मिकता खर्च व जीएसटी १२ टक्के आहे. रु.१,०८,५९, १३३ / ( अक्षरी रुपये एक कोटी, आठ लाख, एकोणसाठ हजार, एकशे तेहत्तीस फक्त ) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

३.  त्यानुसार डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेंच्या २०० प्रशिक्षणार्थी क्षमतेच्या इमारतीमधील १०० निवासी खोल्या, भोजन कक्ष, ग्रंथालय, मनोरंजन कक्ष व हॉल या नुसार प्रति कक्षात १ AC याप्रमाणे १०० AC व हॉलसाठी प्रत्येकी ५ याप्रमाणे २० AC असे एकूण १२० AC परिच्छेद क्र.२ मधील तक्त्यातील निश्चित केलेल्या रु.१,०८,५९,१३३ /- ( अक्षरी रुपये एक कोटी, आठ लाख, एकोणसाठ हजार, एकशे तेहत्तीस फक्त ) इतक्या रक्कमेच्या **प्रस्तावास वित्त विभागाच्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग पाच, अनुक्र. ५, परिच्छेद क्र. १३४ (१) नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय शक्तीचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून उपविभाग-तीन, अ.क्र.४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून,** याव्दारे प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

४.  यासाठी होणारा खर्च मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशीर्ष “२०७०-इतर प्रशासनिक सेवा ००३- प्रशिक्षण-राज्य योजनांतर्गत योजना (०५) (००) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान ( २०७००६८४ ) ३१ सहायक अनुदान “( वेतनेतर )” या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर, काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करावे.

६. आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी यांनी महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र १, मुंबई यांना आणि शासनास तातडीने सादर करावे.

७. उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र १, मुंबई यांना राहतील आणि त्याकरीता संबंधित संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने अनुक्रमे अनौ. संदर्भ क्र.१२६/१४४३, दि.२४.०३.२०२ व संदर्भ क्र.२१९ /व्यय ४, दि.३१.०३.२०२२ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३३१२२३६४०५००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LEENA ASHISH SANKHE

Digitally signed by LEENA ASHISH SANKHE
DN: CN = LEENA ASHISH SANKHE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2022.03.31 22:39:45 +05'30'

**( लिना संखे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) अ. मु.स. (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विभागीय आयुक्त, अमरावती
५) संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
६) उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
८) नियोजन विभा, कार्यासन १४४३ मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
१०) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
११ )निवड नस्ती, कार्यासन १२-अ